**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) साठी बाह्य यंत्रणेमार्फत आवश्यकतेनुसार शिपायांच्या सेवा पुरविण्यासाठी दरकरारास मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सववि-३५.२०/प्र.क्र.१९२/आस्था-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ नोव्हेंबर, २०२१

**पहा :-** १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१०/८४/विसु-१, दिनांक २७.०९.२०१०
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दिनांक ०२.०२.२०१३
३. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखास-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६
४. समक्रमांकाचा दि.०१.१२.२०२० रोजीचा शासन निर्णय

**प्रस्तावना :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) करीता वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक ०२.०२.२०१३ मधील तरतुदीनुसार विभागास शिपायांच्या सेवा पुरविण्याकरीता बाह्य यंत्रणेद्वारे मासिक दराने शिपाई पुरविण्यासाठी मे.शार्प सर्व्हिसेस, मुंबई या संस्थेसवमेत संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०१.१२.२०२० च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१२.२०२० ते दि.३०.११.२०२१ या कालावधीकरीता दरकरार करण्यात आलेला आहे. शिपाई पुरविण्यासाठी करण्यात आलेल्या दि.०१.१२.२०२० च्या करारातील अट क्र.१२ पुढीलप्रमाणे आहे. “कराराचे पालन समाधानकारकपणे न झाल्यास करार केव्हाही संपुष्टात आणणे, तसेच कराराची मुदत शासनास आवश्यकता वाटल्यास आणखी वाढविणे याबाबतचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.” त्यानुसार करार कालावधीत संस्थेने शिपायांच्या सेवा समाधानकारक व नियमितपणे पुरविल्या आहेत. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागात शिपायांची २३ पदे मंजूर असून त्यापैकी १० पदे रिक्त आहेत. सदर पदावर शिपायांच्या सेवा आवश्यकतेनुसार पुरविण्यासाठी मे.शार्प सर्व्हिसेस, मुंबई या संस्थेशी असलेला दरकरार दि.०१.१२.२०२१ ते दि.३१.०३.२०२२ या कालावधीसाठी वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकातील तसेच करारातील तरतुदीनुसार मे.शार्प सर्व्हिसेस, मुंबई या संस्थेबाबतचा शिपाई पुरविण्याचा करार संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयात नमूद अटी व शर्तीनुसार दि.०१.१२.२०२१ ते दि.३१.०३.२०२२ या कालावधीसाठी वाढविण्यात येत आहे. सदर कालावधीत मे.शार्प सर्व्हिसेस, मुंबई या संस्थेने शिपायांच्या सेवा आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन द्याव्यात. शासनास ज्या शिपायांच्या सेवा पुरविण्यात येणार आहेत, त्याचा त्याने स्वत: अथवा एजन्सीमार्फत अपघात विमा उतरवलेला असेल याची एजन्सीने दक्षता घ्यावी. तसेच मनुष्यबळाच्या सेवा वाढीव कालावधीत पुरविण्याबाबत १००/- च्या स्टॅम्प पेपरवर हमीपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०२१११११५३००१४५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS PANDURANG MURUDKAR

Digitally signed by VILAS PANDURANG MURUDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6aa9b488e3be1e9ad6edad4d9fa03bf9159158076b339058f821dcf9efde8c9, pseudonym=7121C2859C4966B569F2FA768D021E18BD04CA0D, serialNumber=5345650B73FE740B5483EACE2F8ECFDE9781E2AB118B5802DB4C4E058395578A, cn=VILAS PANDURANG MURUDKAR
Date: 2021.11.11 15:41:28 +05'30'

**( वि.पां.मुरुडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा)/ विनियम कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
५. मे.शार्प सर्व्हिसेस, १८६-२, लक्ष्मी बाग, सायन पश्चिम स्टेशन समोर, मुंबई-४०० ०२२.
६. कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी (आस्था-२), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडसंग्रह (आस्था-१)